किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत हंगाम २०१९-२० मधील धान/तांदूळ वाहतुकीचे दर निश्चित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन परिपत्रक क्र.वि.स.उ.स./धा.तां.वा./२०१९-२०/का.२
८ वा मजला, गो. ते. रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१.
दि.०८/०७/२०२०

वाचा: १. विसउस काया.पत्र क्र. विसउस /का-१/२०१६-१७/धा.ता./वाहतुक दर/२०७६ दि.२९ डिसेंबर, २०१७.
२. शासन परिपत्रक क्रमांक:-विसउस/का.-२/२०१७ते२०१९/धा.तां./वाहतूक दर, दि.२२ ऑक्टोंबर, २०१८.
३. केंद्रशासनाचे पत्र क्र.१९२ (१४)/२०१८-FC A/Cs, दि.०६.०५.२०१९
४. शासन निर्णय क्रमांक:-२६१९/ प्र.क्र.८४/ना.पु.२९, दि.१६.०८.२०१९
५. शासन निर्णय क्रमांक:- खरेदी-१०१९/प्र.क्र.९८/नापु.२९, दि.०९.०९.२०१९
६. शासन निर्णय क्रमांक:- वाहद-२०२०/प्र.क्र.०४/नापु.२९, दि.१०.०१.२०२०
७. शासन पत्र क्र.अधापु-२०१९/प्र.क्र.१३६/ना.पु.२९, दि.२०.०२.२०२०
८. शासन पत्र क्र.वाहद-२०२०/प्र.क्र.०४/ना.पु.२९, दि.१९.०५.२०२०
९. दि.२५.०६.२०२० रोजीची मा.मंत्री मंडळ बैठक.

**शासन परिपत्रक:-**

केंद्र पुरस्कृत किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत हंगाम २०१६-१७ पासून राज्यात विकेंद्रित खरेदी योजना (DCP) राबविण्यात येत आहे. हंगाम २०१८-१९ मधील धान व सी.एम.आर. वाहतुकीचे दर संदर्भ क्र.२ दिनांक २२ ऑक्टोबर, २०१८ रोजी मंजूर करण्यात आलेले आहेत. सबब, हंगाम २०१९-२० करीता धान व सी.एम.आर.वाहतुक दर मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

केंद्रशासनाचे संदर्भ क्र.३ पत्रान्वये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत धान व तांदूळ वाहतूकीचे दर ठरविणे बाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. त्याअनुषंगाने संदर्भ क्र.४ नुसार राज्यस्तरीय समिती स्थापन करण्यात आली. सदर समितीने SoR (शेड्युलस् ऑफ रेट) निश्चित करुन निविदा प्रक्रिया राबविण्याबाबत जिल्ह्यांना आदेशित केले.

दि.१०.१०.२०१९ रोजीच्या राज्यस्तरीय समितीच्या बैठकीच्या शिफारशींनुसार वाहतूक दर निश्चितीकरीता जिल्हास्तरावर निविदा प्रक्रिया राबविण्यात आली. परंतू, त्यास अत्यल्प प्रतिसाद मिळाला. त्यादरम्यान कोविड-१९ च्या प्रादुर्भावामुळे २५ मार्च, २०२० पासून केलेल्या टाळेबंदीमुळे केंद्रशासनाच्या सूचनांप्रमाणे निविदा प्रक्रिया अपूर्ण राहिली.

संदर्भ क्र.६ अन्वये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी करण्यात येणारा धान व त्यापासून तयार होणाऱ्या तांदळाची/ सीएमआरच्या वाहतूकीबाबत सर्वंकष आराखडा तयार करण्याकरीता राज्यस्तरीय समिती गठित करण्यात आली होती. सदर समितीची बैठक

दि.११.०३.२०२० रोजी घेण्यात आली. त्यामध्ये हंगाम २०१९-२० मध्ये होणारी सीएमआरची वाहतूक हंगाम २०१८-१९ साठी दि.२२.१०.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार निश्चित केलेले दर अधिक घाऊक किंमत निर्देशांकामध्ये झालेली ३.१०% दरवाढ देऊन येणाऱ्या दराप्रमाणे करण्यास शिफारस करण्यात आली. त्यानुसार स्तंभ ४ मध्ये दर्शविल्या प्रमाणे सन २०१९-२० चे वाहतूक दर मंजूर करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | वाहतूकीचे अंतर | सन २०१८-१९ चे संदर्भ क्र.२ अन्वये राज्य शासनाने निश्चित केलेले दर | घाऊक किंमत निर्देशांकानुसार ३.१०% दरवाढ | सन २०१९-२० चे दर |
|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ |
| १ | ०.१ कि. मी ते ५ कि.मी. | रु.५.७५/- संपूर्ण अंतरा करीता | रु.०.१८/- | रु.५.९३/- संपूर्ण अंतरा करीता |
| २ | ५ कि. मी ते १० कि.मी. | रु.१.१५/- प्रति क्विं. प्रति कि. मी. | रु.०.०४/- | रु.१.१९/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ३ | १० कि. मी ते २० कि.मी. | रु.०.८०/- प्रति क्विं. प्रति कि. मी. | रु.०.०२/- | रु.०.८२/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ४ | २० कि. मी ते ४० कि.मी. | रु.०.६९/- प्रति क्विं. प्रति कि. मी. | रु.०.०२/- | रु.०.७१/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ५ | ४० कि. मी ते ६० कि.मी. | रु.०.५७/- प्रति क्विं. प्रति कि. मी. | रु.०.०२/- | रु.०.५९/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ६ | ६० कि.मी. पेक्षा जास्त | रु.०.४६/- प्रति क्विं. प्रति कि. मी. | रु.०.०१/- | रु.०.४७/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |

प्रस्तुत दर हे संदर्भ क्र.७ व ८ अन्वये देण्यात आलेल्या शासन आदेशानुसार गोंदिया, भंडारा, गडचिरोली व नागपूर या जिल्ह्यातील निश्चित केलेल्या बेस गोदामांपासून ते सीएमआरची वाहतूक करणाऱ्या जिल्ह्याच्या निश्चित केलेल्या सिमेपर्यंतच्या अंतराच्या सीएमआर वाहतूकीस तसेच, मिलर ने खरेदी केंद्र ते मिल पर्यंत केलेल्या धान वाहतूकीस व मिल ते बेस गोदामापर्यंत केलेल्या सीएमआर वाहतूकीस लागू राहतील. तसेच, केंद्र शासनाच्या इतर कल्याणकारी योजनांसाठी शासनाच्या आदेशानुसार सीएमआर वाहतूक केली असेल तर त्याला ही हे दर लागू असतील.

सदरचा खर्च या विभागाच्या स्विय प्रपंजी लेख्यामधून मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८- अन्न साठवण व वखार साठवणूक यांवरील भांडवली खर्च, ०१-अन्न, १०१- प्रापण व पुरवठा, (०२) प्रापण व वितरण व किंमत नियंत्रण (०२)(१३) मुंबई शहर किमान आधारभूत किंमत योजनेखालील भरडधान्य/ धान वरील अनुषंगिक खर्च(अनिवार्य)(४४०८०३९१) ५०, इतर खर्च या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

केंद्रशासनाकडुन प्राप्त प्रतीपुर्तीची रक्कम मागणी क्र. एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८ अन्न साठवण व वखार साठवण यांवरील भांडवली खर्च,०१-अन्न,९००,भांडवली लेख्यावरील जमा व वसुली,(०३)प्रापण वितरण व किंमत नियंत्रण,(०३) (०१) मुंबई शहर किमान आधारभुत योजनेखालील जमा व वसुली (अनिवार्य) (४४०८०४०६) ७०,वजा वसुली. या लेखाशिर्षाअंतर्गत जमा करण्यात यावी.

तसेच, राज्य शासनावरील भाराच्या रकमेची प्रतिपूर्ती लेखाशिर्ष २४०८ ०५३८ खाली करण्यात यावी.

सदरचा शासन परिपत्रक वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८२१ दि.१९.०६.२०२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००७०९१६०९०६१३०६ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Abhay Dongar Dhande

Digitally signed by Abhay Dongar Dhande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply Consumer Protection Department, postalCode=4000001, st=Maharashtra, 2.5.4.20=da21a70357404b356571c7082a767be6020327a0e32cf1d6b6fc6accdf98c18d, serialNumber=8cca0ae308227887c4504b21e5b7e00473de5551baf05a30ca1faf3de13e964a, cn=Abhay Dongar Dhande
Date: 2020.07.15 16:35:57 +05'30'

**( अभय धांडे )**
**वित्तीय सल्लागार व उप सचिव**

**प्रति,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, कन्मुर हाऊस, मुंबई-४००००९.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., आदिवासी विकास भवन, जुना आग्रा रोड, नाशिक-४२२००१.
३. सहसचिव (एम.एस.पी), अ.ना.पु व ग्रा. सं. विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. उपायुक्त (पुरवठा), सर्व विभाग.
५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी.